अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागांतर्गत जिल्हा पुरवठा अधिकारी व उप नियंत्रक, शिधावाटप, गट-अ संवर्गातील अधिकारी यांच्या नियतकालिक बदलीबाबत - सन २०२३.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक : बदली-२३२३/प्र.क्र.१३४(भाग-१)/ ना.पु.१५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : ९ मे, २०२३.

वाचा :- १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) अनुसार खाली नमूद केलेल्या अधिकारी यांची त्यांच्या नावासमोरील स्तंभ-४ मध्ये दर्शविलेल्या कार्यालयात सक्षम प्राधिका-याच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीकोनातून बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकारी यांचे नाव | सध्या पदावर कार्यरत असलेले कार्यालय | बदलीनंतर पदस्थापनेचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. प्रशांत एस. काळे | उप नियंत्रक शिधावाटप “ई” परिमंडळ, वडाळा. | श्री. ज्ञानेश्वर जवंजाळ यांच्या नियत वयोमानानुसार सेवानिवृत्तीने दि.३१.०५.२०२३ रोजी रिक्त होणा-या उप नियंत्रक शिधावाटप “फ” परिमंडळ, ठाणे या पदावर |
| २. | श्रीमती आर. एम. बसैय्ये | जिल्हा पुरवठा अधिकारी, जालना | जिल्हा पुरवठा अधिकारी, बुलढाणा या रिक्त पदी. |

२. श्री. प्रशांत एस. काळे यांना दिनांक ३१ मे, २०२३ (म.नं.) पासून स्तंभ-३ मधील नमूद ठिकाणाहून कार्यमुक्त करण्यात येत आहे. श्री. काळे हे उप नियंत्रक शिधावाटप “फ” परिमंडळ, ठाणे या ठिकाणी श्री. ज्ञानेश्वर जवंजाळ यांच्या सेवानिवृत्तीने दि.३१.०५.२०२३ रोजी रिक्त होणा-या पदावर दि.०१.०६.२०२३ (म.पू.) रोजी रुजू व्हावे.

तसेच श्रीमती आर. एम. बसैय्ये यांना दि.०९.०५.२०२३ (म.नं.) रोजी स्तंभ-३ मधील नमूद ठिकाणाहून एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. त्यांनी बदलीच्या पदावर तात्काळ रुजू व्हावे.

३. सदर आदेश हेच कार्यमुक्ततेचे आदेश असून नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई/ उप आयुक्त (पुरवठा), औरंगाबाद यांनी नव्याने आदेश काढण्याची आवश्यकता नाही.

४. सदर अधिकारी त्यांना अनुज्ञेय पदग्रहण अवधीच्या समाप्त होण्यापूर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास त्यांचेविरुद्ध सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण

२०१६/प्र.क्र.१८६/१६/कार्यासन १४, दिनांक २३ डिसेंबर २०१६ मधील तरतुदींनुसार शिस्तभंगविषयक कार्यवाही करण्यात येईल.

५. बदली झालेल्या अधिकारी यांनी त्यांची बदली रद्द करणे अथवा त्यासाठी प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्षरित्या दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न केल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुद्ध शिस्तभंगविषय कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. आहरण व संवितरण अधिकारी यांना कळविण्यात येते की, उपरोक्त अधिकारी यांचे त्यांच्या कार्यमुक्तीच्या दिनांकानंतरचे वेतन कोणत्याही परिस्थितीत पूर्वीच्या नियुक्ती ठिकाणाहून अदा करण्यात येऊ नये अन्यथा त्यांना व्यक्तीश जबाबदार धरण्यात येईल.

७. संबंधित अधिकारी यांनी, त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू झाल्याबाबतची माहिती नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई/ उप आयुक्त (पुरवठा), औरंगाबाद यांचेमार्फत त्वरित शासनास सादर करावी.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०५०९१४४६००९००६ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

९. महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TATOBA MARUTI KOLEKAR

Digitally signed by TATOBA MARUTI KOLEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=f6809ddecc0e0507860e37e9935ab3a7013510f4fe04fad27512588a0bc8e15f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9915405908628D01955F3675ACC122F51E0C39F63F7CC88EEC49CD05616991FD, cn=TATOBA MARUTI KOLEKAR
Date: 2023.05.09 14:48:13 +05'30'

**( ता. मा. कोळेकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) श्री. प्रशांत एस. काळे, उप नियंत्रक शिधावाटप "ई" परिमंडळ, वडाळा. (नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांच्या मार्फत)
२) श्रीमती आर. एम. बसैय्ये, जिल्हा पुरवठा अधिकारी, जालना ( उप आयुक्त (पुरवठा), औरंगाबाद मार्फत)

**प्रत :-**

१) विभागीय आयुक्त (औरंगाबाद/अमरावती)
२) नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई.
३) जिल्हाधिकारी (जालना /बुलढाणा)
४) उप आयुक्त (पुरवठा), (औरंगाबाद/अमरावती)
५) मा.मंत्री (अ.ना.पु.व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
६) सचिव (अ.ना.पु.व ग्रा.सं.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई.
७) महालेखापाल-महाराष्ट्र-१/२ ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
८) महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
९) जिल्हा पुरवठा अधिकारी (जालना /बुलढाणा)
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, (जालना /बुलढाणा/ठाणे)
१३) विभागातील सर्व कार्यासने.
१४) निवड नस्ती, कार्यासन नापु-१५.